**हरीत संकल्पना योजनेंतर्गत तुळजामाता बहुउद्देशीय शिक्षण संस्था, गावंडगांव ता. पातूर जि. अकोला यांना गांडुळखत निर्मिती प्रसार व पर्यावरण जनजागृती या प्रस्तावांतर्गत राबविण्यात येणा-या कामांसाठी निधी मुक्त करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः इएनव्ही-२०१४/प्र.क्र.१३/तां.क.३**

नवीन प्रशासन भवन,१५ वा मजला,हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ७ जानेवारी, २०१७

**वाचा -**

१) पर्यावरण विभागाचा शासन निर्णय क्रमांक इएनव्ही-२०१४/प्र.क्र.१३/तां.क.३,दिनांक: २९ मार्च, २०१४.
२) तुळजामाता बहुउद्देशीय शिक्षण संस्था, गावंडगांव यांचे दि.२३.६.२०१६ रोजीचे पत्र
३) तुळजामाता बहुउद्देशीय शिक्षण संस्था, गावंडगांव यांचे दि.७.७.२०१६ रोजीचे पत्र
४) शासन समक्रमांकाचे पत्र क्र. इएनव्ही-२०१४/प्र.क्र.१३/तां.क.३, दिनांक १८ ऑगस्ट, २०१६ चे पत्र
५) तुळजामाता बहुउद्देशीय शिक्षण संस्था, गावंडगांव यांचे दि.४.११.२०१६ रोजीचे पत्र

**प्रस्तावना-**

पर्यावरण संवर्धनार्थ राज्याच्या स्थानिक गरजा लक्षात घेऊन लोकसहभागातून नाविन्यपूर्ण कार्यक्रम हरित संकल्पना या योजनेंतर्गत विभागामार्फत सन २०१०-११ पासून राबविण्यात येत आहे. या अनुषंगाने योजनेंतर्गत गठित सुकाणू समितीच्या दि.१८.१२.२०१४ रोजी आयोजित बैठकीतील निर्णयानुसार तुळजामाता बहुउद्देशीय शिक्षण संस्थेमार्फत सादर "गांडूळखत निर्मिती जनजागृती कार्यक्रम व अविघटनशील कचराबाबत जनजागृती" प्रस्ताव मंजूर करण्यात आलेला होता. सदर प्रस्तावास नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने रूपये ६.०० लक्ष (अक्षरी रुपये सहा लक्ष फक्त) एवढा निधी मंजूर करण्यात आलेला असून त्यापैकी रूपये २.०० लक्ष ( अक्षरी रुपये दोन लक्ष फक्त) संदर्भाधिन क्रमांक १ च्या शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात आलेले होते.

उपरोक्त मान्यतेच्या अनुषंगाने तसेच दिनांक १४.१.२०१५ २९.६.२०१६, २३.६.२०१६ व दिनांक ७.७.२०१६ रोजीच्या पत्रान्वये संबंधितांनी उर्वरित निधी मुक्त करण्याची विनंती केलेली असल्याने याशिवाय सबंधितांनी खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र तसेच इतर आवश्यक ती माहिती सादर केल्याने सन २०१६-२०१७ या आर्थिक वर्षात तुळजामाता बहुउद्देशीय शिक्षण संस्था, गावंडगांव यांना "गांडुळखत निर्मिती प्रसार व पर्यावरण जनजागृती" या प्रस्तावांतर्गत मंजूर कामे पूर्ण करण्यासाठी मंजूर निधीपैकी वितरीत करावयास शिल्लक निधी रु. ४.०० लक्ष पैकी रुपये २.०० लक्ष मुक्त करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

हरित संकल्पना या योजनेंतर्गत "गांडुळखत निर्मिती प्रसार व पर्यावरण जनजागृती" या प्रस्तावाच्या अनुषंगाने मंजूर कामे राबविण्यासाठी नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने एकूण रू. ६.०० लक्ष (अक्षरी रूपये सहा लक्ष फक्त) एवढा निधी मंजूर करण्यात आलेला होता. त्यापैकी वित्त विभागामार्फत प्राप्त सूचनांच्या अनुषंगाने पहिला हप्ता म्हणून रु. २.०० लक्ष (अक्षरी रुपये दोन लक्ष फ़क्त) एवढा निधी संबंधितांना दि.२९ मार्च, २०१४ रोजी वितरित करण्यात आला होता. वितरित करण्यात आलेला संपूर्ण निधी खर्ची करुन संबंधितांनी विहीत नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र सादर केलेले असल्याने आता या शासन निर्णयाद्वारे संबंधितांना मुक्त करण्यास रुपये २,००,०००/- (अक्षरी रुपये दोन लक्ष फ़क्त) इतकी रक्कम वितरित व खर्च करण्यास संदर्भाधीन दि. १९ मार्च, २०१३ रोजीच्या शासन निर्णयातील सर्व अटी व शर्तीच्या अधीन राहून मंजूरी देण्यात येत आहे .

२. यासाठी वित्त व लेखा अधिकारी, तुळजामाता बहुउद्देशीय शिक्षण संस्था, गावंडगांव ((Finance and Accounts Officer, Tuljamata Bahuuddeshiy sanstha, Akola) यांच्या नावे रू.२,००,०००/- (अक्षरी रूपये दोन लक्ष फक्त) एवढ्या रकमेचा धनादेश काढण्यात यावा.

३. तुळजामाता बहुउद्देशीय शिक्षण संस्था, गावंडगांव यांना अदा करावयाची रू.२.०० लक्ष एवढी रक्कम अधिदान व लेखाधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून काढून तुळजामाता बहुउद्देशीय शिक्षण संस्था, गावंडगांव यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री.वि.गो. कडू, कार्यासन अधिकारी, पर्यावरण विभाग व नियंत्रक अधिकारी म्हणून श्री. म. बा. हजारी, उप सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय यांना घोषित करण्यात येत आहे. त्यांनी तुळजामाता बहुउद्देशीय शिक्षण संस्था, गावंडगांव यांना रू.२.०० लक्ष (अक्षरी रुपये दोन लक्ष फक्त) अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई येथून स्वतंत्र धनादेशाद्वारे वितरित करण्याची कार्यवाही करावी.

४. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च हा मागणी क्र. यू-४, ३४३५ परिस्थितिकी व पर्यावरण ०४, प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रा, १०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (०२),पर्यावरण प्रतिबंध (०२) (१३), पर्यावरण विषयक जनजागृती , शिक्षण, व वातावरणीय बदल कृति योजना, (३४३५ १३०२) ३१,सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या मुख्य- लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ वर्षात अर्थसंकल्पित रु.२००.०० लक्षच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली वर्गीकृत करण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २०.४.१६ मधील परिच्छेद क्रमांक ७(क) अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे. तसेच प्रमाणित करण्यात येते की, दिनांक २०.४.२०१६ च्या शासन निर्णयातील परिच्छेद ७ ते १८ मधील प्रत्येक अटीची तसेच परिशिष्टातील अनुक्रमांक ३ व ९ मधील सर्व अटींची पूर्तता होत असून अनुदान १,२,५,७,८ करिता वित्त विभाग व नियोजन यांच्या मंजुरीची आवश्यकता नाही.

६. याशिवाय, वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा.५, दि.१० मे, २०१६ अन्वये खालील बाबींची पुर्तता होत आहे.

१. विभागास प्रदान वित्तीय अधिकार, सदर प्रस्तावास नियोजन व वित्त विभागाची मान्यता घेण्यात आलेली आहे.

२. प्रस्तावासाठी एकूण रू. ६,००,०००/- (अक्षरी रूपये सहा लक्ष फक्त) एवढा निधी खर्च होणार असून त्यापैकी रु.२.०० लक्ष निधी वितरित करण्यात आलेला असून आता शासनाकडून उपलब्ध करून दिल्या जाणाऱ्या निधीचा उर्वरीत हप्त्यापैकी रू २.०० लक्ष इतका निधी प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात येत आहे.

३. मागील तीन महिन्यात कोणताही निधी मुक्त करण्यात आलेला नाही.

४. "मागणी क्र.यु-४, ३४३५-परिस्थितिकी व पर्यावरण, ०४, प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण,१०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना, (०२) पर्यावरण प्रतिबंध (०२)(१३) पर्यावरण विषयक जनजागृती, शिक्षण व वातावरण बदल कृती योजना (३४३५ १३०२) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर)" या मुख्य लेखाशिर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

५. तुळजामाता बहुउद्देशीय शिक्षण संस्था, गावंडगांव यांच्याकडून पर्यावरण विभागास कोणतेही येणे नाही.

६.तसेच परिच्छेदातील ६, ७, ८, ९ या बाबी लागू नाहीत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६११०८११२१२५०४०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vinayak G Kadoo

Digitally signed by Vinayak G Kadoo
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=92d45ee51f2a551db32f5e6056b22f84b99bcf4c38f0bae7d3cdb71a716490ad, cn=Vinayak G Kadoo
Date: 2017.01.12 16:20:41 +05'30'

**(वि. गो. कड्डू)**
**कार्यासन अधिकारी, पर्यावरण विभाग**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र १/२,मंबई/ नागपूर.
४. श्री. सुभाष शंकर जिजोरे, तुळजामाता बहुउद्देशीय संस्था, गावंडगांव
५. जिल्हाधिकारी, जिल्हा कार्यालय, अकोला.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मंबई.
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८. मा.मंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
९. मा.राज्यमंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
१०. अपर मुख्य सचिव, पर्यावरण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई.
११. प्रधानसचिव, नगरविकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई.
१२. वित्त विभाग (कार्यासन क्रमांक व्यय-१६/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
१३. नियोजन विभाग, कार्यासन क्र.१४७२, मंत्रालय, मंबई.
१४. रोखशाखा, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवडनस्ती.